उपनियंत्रक, वैध मापन शास्त्र या पदावर
दिलेल्या पदोन्नतीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन आदेश क्रमांक - वैमाशा - २०२० / प्र.क्र.५५ / ग्रासं-३**
२ रा मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - १७ जुलै, २०२०

**संदर्भ**
१) शासन निर्णय क्र. वैमाशा-२०१७ /प्र.क्र. १५१/ग्रासं-३, दिनांक- २४ / ५ / २०१८
२) शासन निर्णय क्र.वैमाशा-२०१४/ ८७२ /प्र.क्र.१५१/(भाग-२) / ग्रासं-३, दि. २७ /५ /२०१९
३) सा.प्र.वि.शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०१८/ प्र.क्र. १५९/ कार्या.१२, दि. १/८/२०१९

**शासन आदेश :-**

संदर्भ क्र. १ येथील आदेशान्वये सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र या संवर्गातून श्री. ल. बे. हारोडे, श्री. श. तु. चालीकवार, श्री. शि. स. काकडे व श्रीमती सि. सु. बैस या ४ अधिका-यांना उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र या संवर्गात ११ महिन्यासाठी तदर्थ पदोन्नती देण्यात आलेली आहे. संदर्भ क्र.२ येथील आदेशान्वये सदर पदोन्नतीस पुढील ११ महिन्यांसाठी मुदतवाढ देण्यात आली होती. सद्यस्थितीत उपरोक्त अधिकारी उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र या पदोन्नतीच्याच पदावर कार्यरत आहेत.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये पदोन्नती देतांना अनुसरावयाच्या कार्यवाहीबाबतची एकत्रित्त मार्गदर्शक तत्वे विहित केलेली असून त्यामध्ये तदर्थ पदोन्नती व तात्पुरती पदोन्नती यांच्या व्याख्या स्पष्ट केल्या आहेत. उपरोक्त अधिका-यांना दिनांक २४/५/२०१८ च्या आदेशान्वये दिलेली पदोन्नती ही सरळसेवेच्या कोट्यामध्ये नसून पदोन्नतीच्या कोट्यामध्ये आहे. त्यामुळे सदर पदोन्नती ही तदर्थ पदोन्नती नसून ती तात्पुरती पदोन्नती आहे. त्यानुसार उपरोक्त ४ अधिका-यांना दिनांक २४/५/२०१८ च्या आदेशान्वये सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र या पदावरुन उप नियंत्रक, वैधमापन शास्त्र या पदावर दिलेली पदोन्नती ही निव्वळ तात्पुरती पदोन्नती असल्याचे या आदेशान्वये स्पष्ट करण्यात येत आहे. सदर पदोन्नती खालील अटिंच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात दिनांक २४/५/२०१८ पासून पुढील आदेशापर्यंत देण्यात आल्याचे मानण्यात यावे.

१) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरूपातील पदोन्नती राहील.
२) सदर पदोन्नती, सद्य:स्थितीत सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र या पदाच्या ज्येष्ठता यादीबाबत कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही, तसेच या ज्येष्ठता यादीस आव्हानित देखील करण्यात आलेले नाही ही वस्तुस्थिती विचारात घेऊन केवळ तात्पुरत्या स्वरूपात देण्यात येत आहे.
३) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपात असून सदर पदावर संबंधीत अधिकाऱ्यांचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही.

४) सन २०१६-१७ या निवडसूची वर्षाकरीता पात्र सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांची निवडसूची तात्पुरत्या स्वरूपाची असून उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र पदावरील पदोन्नती ही तात्पुरत्या स्वरूपाची आहे. परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यास नियमित पदाचा व सेवा ज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपाची असून ती केवळ पदोन्नत कोट्यात उपलब्ध होणाऱ्या पदांनुसार नियमित करण्यात येईल.

६) सदर अधिकाऱ्याची उप नियंत्रक पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्याविरूध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरू झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

दरम्यान, पदोन्नतीमधील आरक्षणाबाबत राज्य शासनाने दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ व इतर राज्यांच्या याचिकेबाबत मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.१५.०४.२०१९ रोजी पुढीलप्रमाणे आदेश पारीत केले आहेत. “Until further orders status quo, as it exists today, shall be maintained” सबब, सदर आदेशातील पदोन्नत्या शासन पत्र सामान्य प्रशासन विभाग, दि. २९.१२.२०१७ मधील सूचनांनुसार केवळ तात्पुरत्या स्वरूपात देण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२००७२३११२०२६१५०६- असा आहे. शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHESHRAO BHASKAR KUTE

Digitally signed by SHESHRAO BHASKAR KUTE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b83dd3164bf1a6f2c48a39007e78789c79c52e07ad200c3250d381947c40582e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b9e0c912bdfbc8224f1554ba0bc93342824e4faa118ed64c79ac40826e1611b3, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHESHRAO BHASKAR KUTE
Date: 2020.07.23 11:35:08 +05'30'

**( शे. भा. कुटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व संबंधीत उप नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुख्यालय / कोकण विभाग /पुणे विभाग / औरंगाबाद विभाग (नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांच्यामार्फत)

**प्रत -:**

१. नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल -१ ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल -१ ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई /ठाणे
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे /औरंगाबाद
६. निवड नस्ती, कार्यासन ग्रासं-३